संस्थापक संपादक : साने गुरुजी

साधना साप्ताहिकाचा

# बाल-कुमार

## दिवाळी अंक 2021

पृष्ठे 44 (संपूर्ण बहुरंगी)

किंमत 40 रुपये

प्रकाशनपूर्व सवलतीत 20 रुपये

(50 वा अधिक प्रती घेतल्या तर)

15 ऑक्टोबर 2021 पासून उपलब्ध

या वर्षीच्या अंकात काय आहे?

**चार देशांतील सहा चित्रपट**

# आवाहन

74 वर्षांची परंपरा असलेल्या साधना साप्ताहिकाच्या वतीने मागील 14 वर्षांपासून दरवर्षी बालकुमार दिवाळी अंक प्रकाशित केला जातो. हा अंक जरी 10 ते 15 वर्षे वयोगट समोर ठेवून काढला जात असला तरी पालक, शिक्षक आणि वाचनाची सवय असलेल्या कोणालाही आवडतो.

गेली काही वर्षे हा अंक विशिष्ट थीम घेऊन काढला जातो. या वर्षीच्या अंकाची थीम आहे चार देशांतील सहा चित्रपट. हे चित्रपट मुलांना पाहायला आवडतील व समजतील असे आहेत, या चित्रपटांच्या केंद्रस्थानी बाल व कुमार वयोगटातील मुले-मुली आहेत, पण हे बालचित्रपट नाहीत. त्यातून त्या मुला-मुलींचे भावविश्व प्रकट होते आणि त्यांच्या दृष्टीतून सभोवतालाचे दर्शनही घडते. हे सहा लेख वाचणाऱ्या लहान-मोठ्यांच्या मनात मूळ चित्रपट पाहण्याची इच्छा तीव्र होईल, एवढेच नाही तर आपल्या सभोवतालाकडे अधिक सजगपणे व संवेदनशीलपणे पाहण्याची दृष्टी मिळेल.

असा हा अंक व्यक्तिगत, समूहात्मक व संस्थात्मक पातळीवर जास्तीत जास्त खरेदी करून वाटप केला जावा, भेट दिला जावा अशी विनंती आहे.

- संपादक, साधना साप्ताहिक

अकरा वर्षांचा चिन्मय, वडिलांचा नुकताच मृत्यू झालाय आणि सरकारी नोकरी करणाऱ्या आईची बदली पुण्याहून कोकणात रत्नागिरीला झालेली आहे. तिथली शाळा आणि वर्गमित्र यांच्याशी जुळवून घेण्यासाठी चिन्मय झगडतोय आणि नवी नोकरी व पतीचे निधन या स्थितीत चिन्मयला हाताळताना आईची ओढाताण होते आहे. कोसळलेले संकट, करावे लागलेले स्थलांतर आणि विश्वास मोडून पडणे यांचे दर्शन घडवणारा हा चित्रपट आहे.

# किल्ला

(मराठी, महाराष्ट्र)

**लेखन : दिपाली अवकाळे**

हिमाचल प्रदेशातील एका खेड्यातील बिनिया नावाची बारा वर्षांची मुलगी जनावरे चरायला घेऊन डोंगरात जाते, तेथे काही जपानी पर्यटक तिला भेटतात. त्यांच्याकडे असलेली निळ्या रंगाची मोठी व आकर्षक छत्री तिला आवडते. स्वतःकडील नेकलेस देऊन त्या बदल्यात छत्री मिळवते. आई प्रचंड रागावते. पण अशी वस्तू गावात कोणाकडेच नाही म्हणून बिनियाला वेगळेच ग्लॅमर प्राप्त होते. गावातील एकमेव दुकानदार असलेल्या नंदू खत्रीला त्या छत्रीचा हेवा वाटतो, ती मिळवण्यासाठी तो हर तऱ्हेचे प्रयत्न करतो. त्यातून घडणारे नाट्य..

# द ब्ल्यू अम्ब्रेला

(हिंदी/इंग्रजी, भारत)

**लेखन : मृद्गंधा दीक्षित**

# द कलर ऑफ पॅरडाईस

(पर्शियन, इराण)

**लेखन : हिनाकौसर खान**

इराणची राजधानी तेहरान येथील अंध मुलांच्या शाळेत शिकणारा बारा वर्षांचा मोहम्मद. सुट्टीसाठी गावी जाता येईल याची प्रतीक्षा करतोय, पण त्याचे वडील त्याला घेऊन जाण्यास उत्सुक नाहीत. नाईलाज होतो तेव्हा घेऊन जातात, पण काही अंतरावरील दुसऱ्या गावात एका अंध सुताराच्या हाताखाली काम करायला पाठवतात. कारण काय तर पत्नीचा मृत्यू झालेला आहे आणि दुसरे लग्न करावे लागणार आहे, पण आधीचा अंध मुलगा आहे हे कळले तर ते लग्न होणार नाहीये. हृदय पिळवटून टाकणारी कथा...

# व्हेअर इज द फ्रेंड्स होम?

(पर्शियन, इराण)

**लेखन : समीर शेख**

इराणमधील एका शाळेत दोन खेडेगावातील मुले आहेत. एका गावातला मोहम्मद आणि दुसऱ्या गावातील अहमद. पुन:पुन्हा सांगूनही मोहम्मद त्याचा होमवर्क असलेली नोटबुक आणत नाही म्हणून शिक्षक त्याला तंबी देतात, ‘उद्या आणली नाहीस तर शाळेतून काढून टाकले जाईल.’ त्या रात्री अहमदला कळते, त्याची नोटबुक तर चुकून आपल्या दप्तरात आलेली आहे. आईला तो तसे सांगतो, ती रागावते आणि नोटबुक परत करायला पाठवते. त्या गावात जाऊन मित्राचे घर शोधण्यासाठी त्याला बरीच यातायात करावी लागते.

# द बॉय इन द स्ट्रिप्ट पायजमा

(इंग्रजी, ब्रिटन)

लेखन : सुहास पाटील

ब्रूनो हा आठ वर्षांचा मुलगा. त्याचे वडील नाझी जर्मनीच्या सैन्यात कमांडर आहेत, त्यांची बदली पोलंडच्या सीमारेषेवर झालेली आहे. त्यांच्याकडे कामगिरी आहे, तुरुंगात ठेवलेल्या ज्यू कैद्यांवर देखरेख ठेवण्याची. त्यातील एका कैद्यासोबत त्याचा आठ वर्षांचा मुलगा शमुल राहतोय. ब्रूनो आणि शमुल यांची ओळख होते, मैत्री होते. पण कैद्याचा मुलगा आणि कमांडरचा मुलगा यांच्यातील मैत्री तोडण्याचा प्रयत्न होणे साहजिकच...

# फोरपा/ द कप

(हिंदी-तिबेटन, भूतान)

लेखन : नीलेश मोडक

पल्डन आणि न्यालमा ही दोन मुले बौद्ध भिख्खूंच्या मठात नव्याने दाखल झाली आहेत, त्या दोघांनाही फुटबॉलची आवड आधीपासून आहे. पण नव्या मठात फूटबॉल म्हणजे काय हे कोणालाच माहीत नाही. दरम्यान फुटबॉल विश्वचषकाचा अंतिम सामना जवळ आलाय, तो बघायची त्यांची इच्छा तीव्र आहे. त्यासाठी मठात टीव्ही आणायला हवा, नाही तर रात्री पळून जाऊन कुठे तरी तो सामना पाहायला हवा. त्यातून घडणारे उत्कंठावर्धक व रोमांचक नाट्य, फुटबॉल सामन्यासारखेच...

प्रकाशनपूर्व सवलत नोंदणीसाठी

# सूचना

प्रत्येक अंकाची किंमत 40 रुपये आहे.
मात्र 50 वा अधिक प्रतींची नोंदणी करणाऱ्या व्यक्ती, संस्था, शाळा यांनी एकत्रित मागणी करताना प्रत्येकी रुपये 20 प्रमाणे नोंदणी करावी.

एकूण रक्कम रोख/मनिऑर्डर/चेक/डीडी/ NEFT या स्वरूपात पाठवावी. सोबतचा QR Code स्कॅन करून Goole pay/Phone pay द्वारे रक्कम पाठवणे सर्वाधिक सोईचे! चेक वा डीडी साधना साप्ताहिक या नावाने काढावा किंवा साधनाच्या बँक खात्यावर रक्कम जमा करावी.

खात्याचे नाव : साधना साप्ताहिक/
Sadhana Weekly
सेव्हिंग्ज खाते क्रमांक 60025586634
IFSC Code- MAHB0000001
बँक ऑफ महाराष्ट्र, बाजीराव रोड शाखा, पुणे 2.

(बँकेत रोख, चेक, NEFT, अथवा QR Code द्वारे रक्कम जमा केल्यावर, साधना कार्यालयाला नाव, पत्ता, फोन नंबर कळवणे आवश्यक आहे.)

दिनांक 15 ऑक्टोबरपासून रजिस्टर बुक-पोस्ट, कुरिअर अथवा साधनाच्या वतीने आलेल्या वाहनाद्वारे अंक पाठवले जातील. अंक पाठवण्याचा खर्च साधनाच करेल.

संपर्कासाठी पत्ता
बालकुमार दिवाळी अंक 2021
साधना साप्ताहिक
431, शनिवार पेठ, पुणे 411030
कार्यालयीन फोन 020 24451724 | Mob : 7028257757
email : weeklysadhana@gmail.com

प्रकल्प व्यवस्थापक
गोपाळ नेवे, Mob : 9421702841